**निवासी पोलिस भरती पूर्व प्रशिक्षण या योजनेतंर्गत सन २०२२-२३ या वर्षामध्ये प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याकरीता प्रशिक्षण संस्थाची निवड करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. पोभप्र-२०२२/प्र.क्र.२६/का-९**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २ मार्च, २०२३.

वाचा :-
१) शासन निर्णय क्र. अविवि २००९ /प्र.क्र. १८८/०९/कार्यासन १, दि. २७ जुलै,२००९.
२) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास क्र.पोभप्र २०१५/प्र.क्र.२१३/का-९ दि.१७ डिसेंबर,२०२१.

**प्रस्तावना :-**

राज्यातील अल्पसंख्याक समुहातील उमेदवारांचे पोलिस सेवेतील भरतीच्या प्रमाणात वाढ व्हावी या उददेशाने संदर्भ क्र १ च्या शासन निर्णय दि. २७ जुलै २००९, अन्वये पोलिस भरती पूर्व परिक्षा प्रशिक्षण योजना राबविण्यात येत आहे. सदर योजनेची प्रभावी अंमलबजावणी व्हावी याकरीता सदर योजनेच्या स्वरुपात तसेच कालावधीत बदल करण्याबाबत संदर्भ क्र.२ च्या दि.१७ डिसेंबर,२०२१ च्या शासन निर्णयान्वये सदर प्रशिक्षण कार्यक्रमात सुधारणा करण्यात आली आहे. त्यानुसार सदर प्रशिक्षण कार्यक्रम निवासी स्वरुपाचा व ३ महिने कालावधीचा करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. सुधारीत निवासी पोलीस भरतीपूर्व प्रशिक्षण योजनेअंतर्गत सन २०२२-२३ या वर्षात सदर प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यास इच्छुक संस्थांकडून संबधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांच्याकडे अर्ज मागविण्याकरीता शासन स्तरावरून जाहिरात प्रसिध्द करण्यात आली होती. त्यानुसार इच्छूक संस्थाकडून प्राप्त अर्जाची छाननी करून आपल्या स्पष्ट शिफारशीसह जिल्हाधिकारी यांनी सादर केलेल्या स्थळ पाहणी अहवालानुसार पात्र प्रशिक्षण संस्थाची सन २०२२-२३ या वर्षाकरीता निवड करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील अल्पसंख्याक समुहातील उमेदवारांकरीता शासन निर्णय दि. १७ डिसेंबर,२०२१ अन्वये राबविण्यात येत असलेल्या निवासी पोलिस भरतीपूर्व प्रशिक्षण योजनेअंतर्गत संबधित जिल्हाधिकारी यांच्याकडे प्राप्त अर्जाची छाननी करून आपल्या स्पष्ट शिफारशीसह संबधित जिल्हाधिकारी यांनी सादर केलेल्या स्थळ पाहणी अहवालानुसार खालील १० जिल्हयातील पात्र खाजगी प्रशिक्षण संस्थाची प्रति जिल्हा ५० विद्यार्थ्याकरीता सन २०२२-२३ या वर्षात निवासी पोलीस भरतीपूर्व प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याकरीता निवड करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | जिल्हा | संस्थेचे नाव व पत्ता | विद्यार्थी संख्या |
|---|---|---|---|
| १ | अहमदनगर | धन्वंतरी मेडिकल ॲड एज्यूकेशन फाउंडेशन, अहमदनगर | ५० |
| २ | औरंगाबाद | प्रबोधन बहुउदेशिय संस्था,नाशिक संचलित स्पेक्टम ॲकडमी,एक्स ३४० महावीर चौक बजाज नगर औरंगाबाद | ५० |
| ३ | नागपूर | स्पंदन बहूउदेशिय शिक्षण संस्था विदर्भ हिंदी साहित्य संमेलन झाशिराणी चौक सिताबर्डी,नागपूर | ५० |
| ४ | नांदेड | विवेकानंद बहुउदेशिय शिक्षण क्रिडा सास्कृतिक मंडळ,नांदेड | ५० |
| ५ | हिगोली | १.परिवर्तन बहुउदेशिय सेवाभावी संस्था,कडती ता.जि.हिंगोली द्वारा संचलित श्री संत नामदेव महाज पोलीस भरतीपूर्व प्रशिक्षण संस्था नर्सीनामदेव ता.जि.हिंगोली | ५० |
| ६ | बीड | आझाद हिंद बहुउदेशिय सेवाभावी संस्था म. कामखेडा,ता.जि.बीड | ५० |
| ७ | चंद्रपूर | १.साईबाबा बहुउदेशिय संस्था,पिटीगोडा ता.जिवती जि चंद्रपूर | ५० |
| ८ | गोदिया | १.स्वराज्य प्रतिष्ठान संस्था,नागपूर | ५० |
| ९ | नंदुरबार | १.डॉ बाबासाहेब प्रतिष्ठान,नंदुरबार ता.जि.नंदुबार | ५० |
| १० | सोलापूर | १.विर भगतसिंग पोलीस व सैन्य भरतीपूर्व निवासी प्रशिक्षण केंद्र खांडवी ता.बारशी जि सोलापूर | ५० |

२. निवड झालेल्या संस्थानी शासन निर्णय दि.१७ डिसेंबर,२०२१ व सोबतच्या सहपत्रातील अटि शर्ती तसेच नियमांचे काटेकोर पालन करावे. तसेच शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून १५ दिवसाच्या आत जाहिरात प्रसिध्द करून पात्र उमेदवाराची निवड करावी व प्रशिक्षण कार्यक्रम सुरु करावा व त्याचा अहवाल जिल्हाधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

३. त्याचबरोबर प्रशिक्षण संस्थानी शासन निर्णय दि.१७ डिसेंबर,२०२१ मधील परिशिष्ठ “अ” प्रमाणे प्रशिक्षणासंदर्भात करारनामा सादर करावा. त्याचबरोबर निवासी पोलिस भरतीपूर्व प्रशिक्षण कार्यक्रमाअंतर्गत शासन निर्णय दि.१७ डिसेंबर,२०२१ मध्ये विहित केल्यानुसार अभ्यास साहित्य, प्रशिक्षकाचे मानधन, व्यवस्थापन खर्च, अल्पोपहार, दोन वेळचे जेवण, गणवेश इ. बाबीकरीता येणा-या खर्चाकरीता प्रशिक्षणाच्या सुरुवातीस ५०%, प्रशिक्षण सुरु होऊन २ महिन्यानंतर २५% व प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर उमेदवार प्रत्यक्षात पोलिस भरतीच्या शाररिक व लेखी चाचणी परिक्षेस उपस्थित झाल्याच्या पुरावे सादर केल्यानंतर २५% या प्रमाणात जिल्हाधिकारी मार्फत प्रशिक्षण संस्थेस अनुदान वितरीत करण्यात येईल.

४. निवड करण्यात आलेल्या प्रशिक्षण संस्थेने अल्पसंख्याक समुहाच्या ५० उमेदवाराना ३ महिन्याचे निवासी प्रशिक्षण दयावयाचे आहे. प्रशिक्षणार्थी उमेदवाराना कोणत्याही परिस्थितीत विद्यावेतन देय राहणार नाही.

५.	प्रशिक्षण संस्थेने शासन निर्णय दि.१७ डिसेंबर,२०२१ मध्ये विहित केल्यानुसार अटि शर्ती व तरतूदीचे पालन करावे. याबाबत संस्थेने अटि शर्ती व नियमाचे पालन न केल्याची बाब निर्दशनास आल्यास सदर संस्थेविरुध्द कठोर कार्यवाही प्रस्तावित करण्यात येईल.

६.	संबधित जिल्हाधिकारी यांनी शासन निर्णय दि.१७ डिसेंबर,२०२१ मधील नमुद केल्यानुसार आपले जबाबदारी व कर्तव्य पार पाडावे व वेळोवेळी सदर प्रशिक्षण कार्यक्रम सदर शासन निर्णयामधील तरतूदीनुसार सुरु आहे की नाही हे तपासून अहवाल शासनास सादर करावा. तसेच शासन निर्णयात नमुद केल्यानुसार टप्पा अनुदानपध्दतीने अनुदान मागणीचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

७.	या योजनेसाठी होणारा खर्च मागणी क्र.झेडई ०१ २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, १०७ स्वयंसेवी संस्थाना सहायक अनुदान, ०१ अल्पसंख्याकाना सहायक अनुदान (०१)(३२) पोलिस शिपाई भरतीपूर्व परिक्षा प्रशिक्षण योजनेकरीता विविध संस्थाना सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५ सी २७९) या लेखाशिर्षा अंतर्गत उपलब्ध करून देण्यात येणा-या तरतूदीमधून भागविण्यात येईल.

८.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३०२१७२३१९१३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SARANGKUMAR VASANTRAO PATIL

Digitally signed by SARANGKUMAR VASANTRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=ff4eb5e12b895076f38d0375877408323ed82b780f45ba77108c21a289d50d4b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47644BA707F1CC419E5362269A74B7B1EC6AB4F745648DEF2597546D88711BB4, cn=SARANGKUMAR VASANTRAO PATIL
Date: 2023.03.02 17:27:55 +05'30'

**( सारंगकुमार पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा. मंत्री / मा.राज्यमंत्री (अ.वि.) यांचे खाजगी सचिव,
४. महालेखापाल , १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, (प्रसिध्दीसाठी)
६. जिल्हाधिकारी, अहमदनगर, औरंगाबाद, नागपूर, नांदेड, हिगोली, बीड, चंद्रपूर, गोदिया, नंदुरबार, सोलापूर,
७. अध्यक्ष/ सचिव, संबधित प्रशिक्षण संस्था,
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई, नागपूर,
९. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,नागपूर,
१०.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
११.कक्ष अधिकारी कार्यासन-७ / २ (रोखशाखा), अल्पसंख्याक विकास विभाग, मुंबई.
१२.निवडनस्ती(कार्यासन-९).